अहमदनगर पाटबंधारे विभागाच्या अखत्यारीतील मुळा डावा कालव्याच्या (अंतिम वितरीका सा.क्र. ० ते १६/५६० कि मी) अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.२३०/२०२२)/ सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १२ जून, २०२३

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र.जा.क्र. गोमपाविम-/सिंचन-१ /धा-२५१ / २०२२/३७२५ दि. १३/०४/२०२२.
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे) दि १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे), दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३.

**प्रस्तावना:-**

मुळा नदीवर राहुरी तालुक्यात राहूरी गावाजवळ १९७४ साली धरण बांधून पावसाळयात उपलब्ध हाणारे पाणी उजव्या व डाव्या कालव्याव्दारे सिंचनास देण्यात येत आहे. मुळा डाव्या कालव्याचे काम सन १९७४ साली झाले असून त्यानंतर सदर कालव्या वरील प्रमुख बांधकामाची मोठी दुरूस्ती करण्यात आलेली नाही. कालव्या व्दारे तसेच वितरीके व्दारे सिंचन करत असताना सदर बांधकामा मधून मोठया प्रमाणात गळती होत असून त्यामुळे वहनव्यय वाढून सिंचन व्यवस्थापन विस्कळीत होत आहे.

सद्य:स्थितीमध्ये सदर कालव्यावरील सिंचन लाभधारकांकडून होत असून लाभक्षेत्रावर २८लघुवितरीका स्तरीय पाणी वापर संस्था स्थापन करून सिंचन कायदा २००५ प्रमाणे सिंचन करण्यात येत आहे. तथापि मुख्य कालवा व वितरीका यावरील बांधकामे मुख्य विमोचक , अस्तरीकरण यांची ब-याच वर्षामध्ये दुरूस्त नसल्याने वितरीका स्तरीय पाणी वापर संस्था व कालवा स्तरीय पाणी वापर संस्था हस्तांतरण करून घेण्यास तयार नाहीत. त्यामूळे क्षेत्रिय परिस्थितीनुसार मुळा डावा कालव्यावरील मुख्य बांधकामाची दुरूस्ती, विमोचकांची दुरूस्ती, अस्तरीकरणाची दुरूस्ती व आवश्यक असलेल्या ठिकाणी भरावाच्या दुरूस्ती करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. सदरचे काम पूर्ण झाल्यानंतर २११७ हेक्टर क्षेत्र पुन:र्स्थापित होणार आहे या अनुषंगाने मुळा डावा कालवा अंतिम वितरीका सा क्र. ० ते सा.क्र. १६/५६० कि.मी. मधील विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रस्तावित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अंतर्गत अहमदनगर पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांचे अखत्यारीतील मुळा डावा कालव्याच्या अंतिम वितरीका सा क्र. ० ते सा.क्र. १६/५६० कि.मी मधील रू १,८८,४४,२०७ /- (रू. एक कोटी अठठयाऐंशी लक्ष चौवेचाळीस हजार दोनशे सात फक्त) एवढया खर्चाच्या विशेष दुरूस्ती प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता , निविदा प्रक्रिया, कामाचे नियोजन व पूर्णत्व , प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर वितरीका स्तरीय व कालवा स्तरीय पाणी वापर संस्थेकडे लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय अधिका-याची राहील.

५) सदरचे काम पूर्ण झाल्यानंतर २११७ हेक्टर क्षेत्र पुन:स्थापित होणार आहे

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०० मोठे पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (०४)(०६) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र) (कार्यक्रम ) (४७०० ०२७४) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. ०६ सन २०२३-२४ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१२१७४१५८१५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: CN = NAMITA GAURAV BASER, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.06.12 17:42:46 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
**शासनाच्या उप सचिव**

**सोबत :- सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) अमुस (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१३) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१५) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१६) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१७) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग ,उत्तर महाराष्ट्र प्रदेश नाशिक ,

१८) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१९) अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिक,

२०) कार्यकारी अभियंता, अहमदनगर पाटबंधारे विभाग ,अहमदनगर

२१) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.२३०/२०२२)/ सिंव्य (कामे),**

**दि. १२/०६/२०२३ चे सहपत्र**

| **Sr.No.** | **Description of Item** | **Amount in ( Rs. )** |
|---|---|---|
| 1 | C - Works (excluding Royalty) | 14232952 |
| 2 | Royalty | 2760972 |
| 3 | १ % Insurance | 142329 |
| 4 | १२ % GST | 1707954 |
| | **Total Rs.** | 1,88,44,207 |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: CN = NAMITA GAURAV BASER, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.06.12 17:43:00 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
**शासनाच्या उप सचिव**